ॐ श्रीगणेशाय नमः । आदिशक्ति कथा पुढती सांगत । सिंधूचे हेर गुप्तरूपें संचरत । जाणून गुणेशाचा जन्म वृत्तान्त । सिंधूस कथिती सत्वर ते ।।१।। शक्तींनो ह्या कालावधींत । आकाशवाणी दैवी होत । सिंधु ऐकून भयभीत । आठवी शब्द ते पुनः पुन्हां ।।२।। दैत्यनाथा गुणेश त्वरित । ठार करील तुला निश्चित । चराचर करील धर्मयुक्त । त्रिवार सत्य हें जाण ।।३।। हें ऐकून आकाशवचन । दैत्य पडला मूर्च्छा येऊन । नंतर जाहला सावधान । क्षणभरानें तैं निराश ।।४।। तो मंदधी शोक करित । दैत्येंद्रास पाठवित । त्या गुणेशा मारण्या झटत । दैत्यनायक सर्व यत्नें ।।५।। गुप्तरूपें ते सर्व जात । त्रिसंध्या क्षेत्रांत समस्त । नाना मायेचा आश्रय घेत । पशुपक्ष्यांचीं रूपें घेती ।।६।। त्यांचें कपट जाणून । ठार मारी त्यांस शिवनंदन । शोक करी पार्वती चिंताग्रस्त मन । असंख्य दैत्य पीडा देती ।।७।। त्या सर्वांसी नित्य मारित । परी दैत्य राजे प्रत्यहीं उद्युक्त । माझ्या पुत्रा मारण्या उत्कंठीत । काय करतील ते त्यासी ।।८।। गुणाधीशासी मारतील । या भयानें ती व्याकुळ । साक्षात् ब्रह्मपति विमल । म्हणे पुत्र माझा पूर्ण ब्रह्म ।।९।। भाग्यहीन प्रभावें यास । होईल का पीडा प्रयास । तेव्हां माया करी गुणेश । मोहिनी घाली पार्वतीसी ।।१०।। मोहवश देवी मानित ।

गणेश्वरासी आपुला सुत । त्याचें ब्रह्मरूप विसरत । ऐसा प्रभाव मायेचा ।।११।। त्या वेळीं मरीची योगी येत । गणपास जो सदैव भजत । म्हणे विघ्नपा दर्शन दे मजप्रत । आकाशवाणी तैं जाहली ।।१२।। तो महायोगी ती ऐकत । शिवपुत्र झाला गणेश जनांत । त्यास जाऊन भेट त्वरित । त्यानुसार योगी तेथ आला ।।१३।। हर्षभरें तो तेथ जात । पार्वती त्याचें स्वागत करित । प्रणाम करून पूजित । भोजनादिक देतसे ।।१४।। तदनंतर त्यास प्रार्थित । मुने तूं ब्रह्मभूत साक्षात । माझा आश्रय सोडून सांप्रत । जाऊ नको कोठेही ।।१५।। तीर्थादिक स्थानाप्रत । गणेशभजनीं तूं रत । जैसा विघ्नहर देव निश्चित । तैसा तूही आम्हांसी ।।१६।। म्हणून तुज प्रार्थित । राख आता माझा सुत । दैत्यादी समूह सतत । भयंकर सर्वत्र काळासम ।।१७।। गणेशास मारण्या उद्युक्त । परी ते मृत्यु पावत । आमुचा कुलदेव विघ्नेश असत । यांत संशय कांहीं नसे ।।१८।। तोच रक्षितो मम सुतास । अन्यथा मृत्युचें भय त्यास । शंकरें सेविलें गणेशास । तें पुण्य रक्षी माझ्या सुता ।।१९।। पार्वतीचें ऐकून वचन । महामुनि झाला विनीतमन । ही साक्षात शक्ति भ्रांत होऊन । विघ्नपास सुत मानी ।।२०।। परी करण्या समाधान । गणेशकवच तिज करी कथन । शंभुसुतास प्रणाम करून । स्तुति करून परतला ।।२१।। तदनंतर जे दैत्यराज येत । मारण्या गुणेशा उत्कंठित । त्या नानावेषधारकांसी वधित । बाळक्रिडा ती तयाची ।।२२।। एकदा पार्वती प्रात:काळीं । उठून शिवपूजनीं रत झाली । लिंगमयी मूर्ति केली । ठेविली डाव्या हातावरी ।।२३।। आवाहन शंकराचें करून । करी तयाचें पूजन । त्या वेळीं गुणेश प्रकटून । म्हणे मजला स्तन्य देई ।।२४।। पार्वती म्हणे बाळा क्षणभर । देईन स्तन्य धरी धीर । महेशाचें पूजन एकाग्र । प्रथम पूर्ण करितें मीं ।।२५।। तैं तो सुत तिज विचारित ।

या लिंगाचें कां पूजन करित । तूं मज सोडून एकचित्त । शंकर काय अधिक देणार ।।२६।। माते मज दे स्तनपान । त्यायोगें अनंत शिवांचें समाधान । शैलनंदिनी ब्रह्में प्रसन्न । होतील मज तोषवितां ।।२७।। तथापि पार्वती हांसोन । न दे तयास स्तनपान । तेव्हां क्रोधवश आरक्त नयन । जाहला मयूरेश खरोखर ।।२८।। तळव्याचा आघात करून । शिवलिंग भूवरी पाडवून । तें देई दूर लोटून । भग्न जाहलें तें तेव्हां ।।२९।। शक्तींनो पार्वती अति दुःखित । विकटासी चापट मारित । येऊन क्रोध अत्यंत । गणेश्वरही क्रुद्ध झाला ।।३०।। आपुल्या मातेस कडकडून । चावला तैं गजानन । करांगुली चावून । रक्त काढलें तयानें ।।३१।। हाहाःकार करून रडत । पार्वती तैं गुणेश पळत । तिज त्यागून भयभीत । बाळक्रीडा दाखविली ।।३२।। जो भयदाता सर्व विश्वाप्रत । तो मातेसी त्या वेळ घाबरत । शैवलिंग भग्न पाहून रडत । प्राणप्रतिष्ठित जें होतें ।।३३।। पार्वती अतिशोक करित । म्हणे हें शिवहत्येसम दुर्वृत्त । पाप घडलें मज अत्यंत । पतिवधासम हें असे ।।३४।। हा माझा पुत्र गुणेश वाटत । नरकप्रद मजप्रत । ऐसा पुत्र होऊन होत । जन्म माझा पापिष्ठ ।।३५।। वांझ जरी राहिलें असतें । तरी तेंही मज गमतें । हा कुलक्षण पुत्र यातें । काय माया लावावी ।।३६।। याच्यामुळें शिवलिंग भंगलें । पतिवधासम पातक घडलें । आतां गजाननास स्मरून पहिलें । संपवीन माझे जीवन ।।३७।। दुःखित मी गणेशा ध्याऊन । देहत्याग आतां करीन । विघ्नराजा तुज नमन । तैं घडलें एक आश्चर्य ।।३८।। गणेशाच्या स्मरणें होत । बुद्धिभेद तिच्या चित्तांत । गणराजा पुत्ररूप पाहत । समीप तेव्हां पार्वती ।।३९।। एक काठी करीं घेऊन । मारण्या धावें पार्वती उन्मन । परात्पर पुत्रा त्या महान । तोही भीतीचें नाटक करी ।।४०।। भय पाहून पळून जात ।

पार्वतीस पाहून तो त्वरित । ती धावून त्यास पकडित । शिवप्रिया पार्वती ।।४१।। तैं विघ्नेश माया करित । स्वत: शिवमय होत । शंकरास पाहून मोहित । पार्वती जेव्हां दु:खमग्न ।।४२।। तो शंकररूप गजानन । शैलसुतेसी बोले वचन । मज महेशा मारण्या मन । कां केलेंस प्रिये त्वा ।।४३।। मज मारण्या काठी हातांत । कां घेतलीस प्रिये रोषांत । त्यास सोडितां पुनरपि घेत । पुत्ररूप गणराज तो ।।४४।। पार्वती अत्यंत दु:खित । देहत्यागाचा निश्चय करित । पुनरपी पार्वती त्या पुत्रा पाहत । धावें मागुनीं मारावया ।।४५।। भयभीत तो बाळ पळत । देवी त्याचा पाठलाग करित । तो पुत्र जाई वनांत । कर्दमदैत्य तेथ तैं आला ।।४६।। शैव ब्राह्मणाचें रूप घेऊन । बाळासी म्हणे तो कृपा दाखवून । बाळा धावसी सांग कारण । रक्षीन तुज मीं नि:संशय ।।४७।। येथेच थांब क्षणभर । मातेसी न माहित हें स्थान दूर । बाळभावें गुणेशें होकार । तयासी तेव्हां दिधलासे ।।४८।। त्या कर्दमासुरें बाळ पकडिला । सत्वरीं गिळून टाकिला । सिंधूचा महाशत्रू नष्ट केला । विचारें अति हर्षित ।।४९।। सर्व दैत्यांचें भय नष्ट केलें । गुणेशासी मीं ग्रासिलें । तव तेथें जगदंबेचें आगमन झालें । ती पाठलाग करी गुणेशाचा ।।५०।। त्या शैव ब्राह्मणा म्हणत । स्वामी पाहिला का माझा सुत । कोठें जाहलासे गुप्त । तुमच्याच सन्निध होता तो ।।५१।। यापुढें पदपंक्ति न दिसत । आलें त्याचा माग काढित । परशु आदि चिन्हें ज्ञात । माझा बाळ कोठें असे? ।।५२।। तो द्विज म्हणे शैलजेप्रत । मीं न पाहिला तुझा सुत । शिवाची घेतों शपथ । पाहिला नाहीं पुत्र तुझा ।।५३।। तदनंतर अति दु:खित । पार्वती स्मरे द्विरदानना चित्तांत । तेव्हां त्या कर्दमाच्या मुखांतून त्वरित । बाहेर पडला गुणेश ।।५४।। गणनायक बाहेर पडून । मुष्टिघातें करी हनन । तो असुर पडला मरून।

महादुष्ट भयंकर ।।५५।। अठरा योजनें तो पसरला । तैं त्या राक्षसा मृत पाहून झाला । पार्वतीस आनंद आगळा । क्रोध सारा ती विसरली ।।५६।। पुत्रास घेऊन स्वाश्रमाप्रत । गेली पार्वती स्वगृहांत । तेव्हां पुत्र तिचा लोळत । भूमीवरी गडबडा ।।५७।। पुन: पुन: जांभया देत। विकटानन बळवंत । त्या बाळाच्या मुखांत । विश्वाचें दर्शनें घडलें तिला ।।५८।। तें पाहून भयसंकूल । अनंत ब्रह्मांड दर्शनें पाहून विमल । पार्वती पडली धरणीवर अबल । स्वगुरु शंकरातें स्मरे ।।५९।। आपुल्या इष्ट देवा गणेशा स्मरत । तेणें मोहहीन होत । पार्वती मनीं विचार करित । गणेश देव तो हा पुत्र झाला ।।६०।। त्यास सोडून लिंगसेवेंत । मूर्खासम मी झालें रत । पतिभावें देहधारी शंकरा देवेशासी पूजित । गणेशभजन विसरले देवभावें ।।६१।। तें सारें मीं विसरलें। मूढभावें स्तनपान गुणेशा न दिलें । ज्या गुणेशांत स्थित झाले । शंकरादि अनंत देव ।।६२।। तो तुष्ट होतां संतुष्ट ।ते सारे देव होती त्वरित ।गणेश ब्रह्मांचा नाथ । तोही संतुष्ट त्यायोगें ।।६३।। असे ह्यास शिवरूप मीं पाहिलें । फसून त्यास पकडलें । तरीही त्याचें सत्यरूप न उमजलें। कैसें तें मज समजेना ।।६४।। आतां यापुढें सर्वभावें भजेन । पुत्रभावधारी गणेशान । हा पति हा तात ही माता भिन्न । हा पुत्र हा सुहृद तैसा ।।६५।। हा सारा भेद असत्य असत । हा गुणेशचि ब्रह्म विश्वांत। तोचि शांतिप्रद निश्चित । ऐसें ठरवून प्रणाम करी ।।६६।। भक्तिनम्र मान वाकवून। त्या पुत्रासी तोषवून । त्याचें करून स्तवन। आराधना करी ऐसी ।।६७।। ती ऐसी स्तुति करित । गणेश तैं मोहें पाडवित । देवी होऊन संमोहित। विस्मृति तिजला परम झाली ।।६८।। पुत्रभावें विघ्नेशाचें लालन। गृहकार्यरत देवी करी पालन । तेव्हां शक्ति विचारिती प्रसन्न । गणेश जरी ब्रह्मनायक ।।६९।। परी तो पुत्रभाव घेत । बाळक्रीडार्थ

उद्युक्त । कां दाखविलें अखिल ब्रह्मांडयुक्त । विश्व त्यानें आपुल्या मुखीं ।।७०।। शिवरूप कां दाखवित । दाखवून पुनरपि हें अद्भुत। लोप कां केला तें समस्त । जाणण्या कुतूहल आमुच्या मनीं ।।७१।। आदिशक्ति म्हणे वचन । संशय तुमचा दूर करीन । पुत्रभावमय भक्ति ग्रहण । लालस सदा गजानन ।।७२।। वरदान प्रभावें तपाचें फळ देत। कार्य करून समस्त । सुरर्षीचें अंन्तर्धान पावत । तेव्हां देवीस स्मरण होईल ।।७३।। गणेश पुत्रभावें आला होता । याचें स्मरण तिज होतां। सुत मानला त्यासी तत्त्वता । हें अज्ञान निश्चित ।।७४।। पार्वती ऐसा विचार करील । पुत्रासम राहिला सदनीं विमल । गणेशें दाखविलें स्नेहबळ । ब्रह्मसामर्थ्य तयाचें ।।७५।। त्याचें माहात्म्य न कळलें । हेंचि आजि कळो आलें । ह्या विचारें भक्तिभाव झाले । युक्त तिच्या मनांत ।।७६।। अति भक्तिसंयुक्त । गजाननास ती तैं भजत । म्हणोनि गणराज हें करित । बाळपणीं कौतुक सारें ।।७७।। ऐशापरी नाना दैत्य वधून । शिवपार्वतीचें करी सेवन । पुत्रभावें त्यांस तोषवून । वरदान आपुलें सत्य केलें ।।७८।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते बालखेलावर्णनं नामाष्टत्रिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय अडतिसांवा संपूर्ण)